**सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदान (योजनेत्तर) वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२५१७/(१०१/१५)/साशि-५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ जून, २०१५

वाचा : १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र अर्थसं-२०१५/प्र.क्र. ८५/अर्थ ३,दिनांक १७.०४.२०१५.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभागाचे पत्र क्र अर्थसं-२०१५/प्र.क्र.४३/साशि १, दिनांक २१.०४.२०१५
३) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३२/२०१५-१६/१७९३, दिनांक १०.०६.२०१५

**शासन निर्णय:**

राज्यातील एकूण ११,९९६ शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांना सहाय्यक अनुदान योजनेअंतर्गत सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात मंजूर केलेल्या एकूण रु.८३,१९,६०,००० तरतूदीमधून संदर्भ क्रमांक १ येथील परिपत्रकानुसार देय असलेल्या ७०% च्या मर्यादेत एकूण रुपये ५८,२३,७२,००० निधी राज्यातील शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांच्या सहाय्यक अनुदानासाठी खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. हा निधी **मागणी क्रमांक डब्ल्यू- ४, २२०५ कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०१) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य (२२०५ ०२९८) (योजनेतर) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)** या लेखाशिर्षाखाली चालू वर्ष २०१५-१६ करीता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. अनुदानाच्या रक्कमेची उपयोगिता प्रमाणपत्रे ग्रंथालयांनी विहित मुदतीत सादर करणेआवश्यक राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२२११५३३११९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra Vishnu Jadhav

Digitally signed by Rajendra Vishnu Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Vishnu Jadhav
Date: 2015.06.22 11:55:21 +05'30'

( राजेंद्र वि. जाधव)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

३. प्र.ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

५. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)

६. प्रधान सचिव(उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक

७. निवडनस्ती (साशि-५)